**श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना (गट-अ/राजपत्रित) मुख्य कार्यालय, पुणे यांची स्वेच्छासेवानिवृत्ती मंजूर करुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन आदेश क्र. स्वेच्छानि-४९२०/२६०/प्र.क्र.४०/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०२ सप्टेंबर, २०२०.

वाचा :- १. श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांचा दि.२८.०१.२०२०, दि.०३.०३.२०२० व दि.१०.०८.२०२० चा अर्ज.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/संबासा-उसंनर/स्वेच्छासेवानिवृत्ती/प्रशा-१ब/१२३५, दि.१३.०३.२०२०.

**प्रस्तावना :-**

श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांनी वैद्यकीय व कौटुंबिक कारणास्तव स्वेच्छा सेवानिवृत्ती घेण्याची इच्छा व्यक्त करुन दि.२८.०१.२०२० रोजीच्या अर्जान्वये ०३ महिने पूर्वसूचना (Notice) दिली आहे. त्यास अनुसरुन संचालक, नगर रचना, पुणे यांनी दि.१३.०३.२०२० च्या पत्रान्वये श्री.सावजी यांच्या स्वेच्छासेवानिवृत्तीचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. श्री.सावजी यांनी त्यांच्या दि.२८.०१.२०२० च्या अर्जान्वये दिलेली स्वेच्छासेवानिवृत्तीची नोटीस दि.०३.०३.२०२० अर्जान्वये मागे घेतली होती. परंतु, श्री. संजय बाळकृष्ण सावजी यांनी दि.१०.०८.२०२० च्या पत्रान्वये दि.०१.१०.२०२० किंवा तत्पूर्वी स्वेच्छासेवानिवृत्त होण्याची इच्छा व्यक्त करुन शासनास विनंती केली आहे. त्यानुसार श्री.सावजी यांच्या स्वेच्छासेवानिवृत्तीबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६५ (१) (ए) मधील तरतूदीनुसार श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना, मुख्य कार्यालय, पुणे यांची दि.२८.०१.२०२० रोजीची स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना स्वीकारुन त्यांना दि.०२.०९.२०२० (म.नं.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. राज्य प्रशिक्षण धोरणातंर्गत श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना, यांच्या जपान येथील परदेश दौरा व यशदा पुणे येथे Planning for sustainable cities in Maharashtra या विषयांच्या प्रशिक्षणासाठी एकूण रु.२,०८,५००/- (अक्षरी रु.दोन लाख आठ हजार पाचशे फक्त) इतका खर्च झाला आहे. संचालक, नगर रचना, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार, नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. टिपीएस-१८१३/३४०७/प्र.क्र.५३७/१३/नवि-१३, दि.०८.०५.२०१५ मधील परिच्छेद (१) (ड) संकीर्ण (३) मधील व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम १३४

मधील तरतुदीनुसार श्री.सावजी यांच्या परदेश दौरा व प्रशिक्षणावर झालेल्या खर्च **रु.२,०८,५००/- (अक्षरी रुपये रु.दोन लाख आठ हजार पाचशे फक्त)** त्यांच्या मृत्यू-नि-सेवानिवृत्ती उपदानाच्या रकमेशी समायोजित करण्यात यावा.

**०३.** श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) यांच्याविरुद्ध सद्यस्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन / लाचलुचपत / शिस्तभंगविषयक प्रकरण सुरु अथवा प्रलंबित / प्रस्तावित नाही तसेच त्यांच्याकडून वरील रक्कमे व्यतिरिक्त कोणत्याही प्रकारचे शासकीय येणे शिल्लक नाही, या अटींच्या अधीन राहून त्यांना स्वेच्छा सेवानिवृत्त होण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**०४.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या प्रकरणी आवश्यक ते कार्यकारी आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

**०५.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०२००९०२१२४०११७०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.09.02 16:43:28 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. महालेखापाल,/ महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई.
४. महालेखापाल,/ महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर.
५. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. (३-प्रती)
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२. श्री. संजय बाळकृष्ण सावजी, उप संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) मुख्य कार्यालय, पुणे यांना (संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)
१३. निवडनस्ती / नवि-२७.

***